**शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नाशिक या संस्थेतील विद्यार्थ्यांसाठी एक ४४ आसनी बस भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
शासन निर्णय क्रमांक : वाहन-०२२५/प्र.क्र.५५/प्रशा-२
गो. ते. संकुल इमारत, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख : ०२ एप्रिल, २०२५.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
२) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र: भाखंस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: शापसे-३४२२/प्र.क्र.७८/का.३१, दिनांक ०१.०६.२०२३.
४) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय यांचे पत्र क्र. संवैशिवस/म/शावैमना/ बस भाडेतत्वावर/१३७५/२०२५, दिनांक १४.०२.२०२५.

**प्रस्तावना :-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नाशिक या संस्थेकरीता शासनमान्य पुरवठादाराकडून विद्यार्थ्यांच्या विविध शैक्षणिक उपक्रमासाठी संस्थेकरिता खाजगी बस (४४ आसनी) भाडे तत्वावर घेण्याचा प्रस्ताव आयुक्त, वैद्यकीय शिक्षण यांनी त्यांच्या दिनांक १४.०२.२०२५ च्या संदर्भाधीन पत्रान्वये शासनास सादर केला आहे. त्याअनुषंगाने सदर संस्थेतील विद्यार्थ्यांच्या विविध शैक्षणिक उपक्रमासाठी खाजगी बस (४४ आसनी) भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नाशिक या संस्थेतील प्रवेशित विद्यार्थ्यांच्या विविध शैक्षणिक उपक्रमासाठी ०१ खाजगी बस (४४ आसनी) संदर्भ क्र. ३ वरील सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक ०१.०६.२०२३ अन्वये निश्चित केलेल्या पुरवठादार संस्थांच्या पॅनलमधील एका पुरवठादार संस्थेकडून सदर शासन निर्णयासोबतच्या “विवरणपत्र-अ” मध्ये निश्चित करण्यात आलेल्या दरसूचीनुसार भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास व त्यासाठी येणाऱ्या रुपये २७,००,०००/- (रुपये सत्तावीस लक्ष फक्त) (करांशिवाय) एवढ्या वार्षिक खर्चास तसेच त्यावरील अनुज्ञेय कर अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर वाहनाच्या भाड्यापोटी येणारा वार्षिक खर्च शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नाशिक (लेखाशिर्ष २२१० के २१२) संस्थेच्या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्षात (१३) कार्यालयीन खर्च या उद्दिष्टांतर्गत उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग दोन, अनुक्रमांक-१३, नियम क्र. ६० व ६१ अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४०२१५३०३६७७१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO GIRDHARI JOGDAND

Digitally signed by MAHADEO GIRDHARI JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO GIRDHARI JOGDAND
Date: 2025.04.02 16:03:02 +05'30'

**(म. गि. जोगदंड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखाकार - १/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, संचालनालय, मुंबई.
४. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नाशिक,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
६. निवडनस्ती (प्रशा-२).